जालना जिल्ह्यातील बदनापूर तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.११६/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- २६ जून, २०२३.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र. मुअऔ/का-१४/प्रआ/रवियो/१२०२, दि.२४/०३/२०२३.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी संदर्भाधिन पत्रान्वये जालना जिल्ह्यातील बदनापूर तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, जालना यांची मागणी विचारात घेता, सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, जालना यांचा मागणी विचारात घेऊन जालना जिल्ह्यातील बदनापूर तालुक्यातील खालील इतर जिल्हा मार्ग प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रजिमा-२० ते वाकुळणी-वाहेगांव बाजार-रामा-२२५ ते मांजरगाव ते देवपिंपळगांव-सिरसवाडी ते जालना रस्ता. | इतर जिल्हा मार्ग - १६० | (०/०० ते २५/१००) २५.१०० कि.मी. | २५.१०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-६६ |
| | **एकूण** | | | **२५.१०० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील मधील जालना जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **२५.१०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (१४१७.२०० + २५.१००) म्हणजेच **१४४२.१०० कि.मी.** इतकी तसेच इतर जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत २५.१०० कि.मी. ने घट होवून एकूण लांबी (१४८६.३०० -२५.१००) म्हणजेच **१४६१.२०० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०६२७१२४२१२५११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.06.27 12:43:11 +05'30'

**( ग. सं. कचरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, औरंगाबाद. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) जिल्हाधिकारी, जालना.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना.
३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जालना.
४) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
५) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
६) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
७) निवडनस्ती.